मौजे जयगड प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता.जि.रत्नागिरी या नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-१३१८/प्र.क्र.२२१/पापु-०६**
**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मुंबई-४०० ०३२.**
**तारीख: ०७ जानेवारी, २०१९.**

वाचा:-

१) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांचे दिनांक २३ मे, २०१८ यांचे पत्र क्रमांक मजीप्रा/मु.अ./ठाणे/तांशा-२/धा-४७/९८३, दिनांक २३ मे, २०१८.
२) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांचे पत्र बाब क्र.१४, दिनांक २२.५.२०१८
३) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७, दिनांक १७ मार्च, २०१०
४) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१३
५) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११३/प्र.क्र.१५६/पापु-०७, दिनांक २२ जानेवारी, २०१४
६) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै, २०१४
७) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१४
८) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११५/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक १६ फ़ेब्रुवारी, २०१५
९) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३४/पापु-०७, दिनांक २० फ़ेब्रुवारी, २०१५
१०) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १० मार्च, २०१५
११) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७, दिनांक १५ जून, २०१५
१२) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
१३) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो-२०१७/प्र.क्र.५३/पापु-०७, दिनांक ०९ मार्च, २०१८.

**प्रस्तावना:-**

मौजे जयगड प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता.जि.रत्नागिरी या नळ पाणी पुरवठा योजनेच्या प्रस्तावास मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांच्या संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेचा दरडोई खर्च हा विहित निकषापेक्षा जास्त असल्यामुळे सदर नळ पाणी पुरवठा योजनेस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांनी शासनाच्या मान्यतेकरीता सादर केलेला आहे. त्यामुळे मौजे जयगड प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता.जि.रत्नागिरी या नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मौजे जयगड प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता.जि.रत्नागिरी या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.१२,२१४/-(धरणाच्या किंमतीसह) व धरणाची किंमत वगळता रु.३,५८२/- (३० मीटर्सपेक्षा जास्त Static Lift असलेल्या (४० LPCD) नळ योजना रु.२५६१/- च्या १००% वाढीव म्हणजेच रु.५१२२/- च्या मर्यादेबाहेर आहे.) इतका दरडोई खर्च असलेल्या योजनेच्या रु.३२,०२,६७,५००/-(ढोबळ) (अक्षरी रुपये

बत्तीस कोटी दोन लक्ष सदुसष्ट हजार पाचशे फक्त) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाअंतर्गत खालील अटी व शर्तींची पुर्तता करण्याच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फ़त करण्यात यावी. योजनेची अंमलबजावणी पूर्ण झाल्यानंतर किमान १ वर्षे योजना चालविणे कंत्राटदारावर बंधनकारक राहील. योजना यशस्वीरित्या पूर्ण झालेली आहे याची खात्री महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने करावी, तसेच योजनेच्या देखभाल दुरुस्तीसाठी संदर्भाधीन क्र. ६ येथील दिनांक १७ ऑक्टोबर, २०१४ रोजीच्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचा अवलंब करावा.
२) योजनेची अंमलबजावणी होऊन कंत्राटदारामार्फत योजना किमान १ वर्ष चालविण्यात येणार असली तरी ग्रामस्थांकडून या एक वर्षाचीही पाणीपट्टी वसूल करण्यात यावी. वसूल करण्यात आलेली पाणीपट्टी योजना चालविणाऱ्या संस्थेस देण्यात यावी.
३) योजनेच्या अंदाजपत्रकास नव्याने तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.
४) योजनेची कामे विहीत पध्दतीने ई-निविदा मागविण्यात येऊन करावीत.
५) योजनेसाठी आवश्यक भूसंपादन व इतर सर्व परवानग्या प्राप्त करण्याकरीता जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात यावी. सदर समिती रेल्वे/रस्ते/वन जमिनीची क्रॉसींग व भूसंपादनाचा प्रत्येक महिन्याला आढावा घेईल.
६) योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळ जोडण्यांचा व मीटरचा समावेश करण्यात यावा. तसेच किमान ८० % नळजोडणी धारकाकडून स्वखर्चाने मीटर जोडणी घेण्याबाबत हमीपत्र घेण्यात यावे व त्याची एक प्रत लॅमिनेट करुन नळ जोडणी धारकास द्यावी व एक प्रत ग्रामपंचायतीकडे ठेवण्यात यावी. तद्नंतरच कार्यारंभ आदेश देण्यात यावेत.
७) ग्रामसभा ठराव/हमीपत्र दिल्यानंतरही एखाद्या गावांने पाणी घेण्यास नकार दिला तरी त्याच्याकडून किमान ५० टक्के पाणीपट्टी वसूल करण्यात यावी. याबाबत ग्रामस्थांना निविदा प्रक्रियेच्या अगोदरच कल्पना देण्यात यावी व ग्रामसभेचा तसा ठराव घेण्यात यावा.
८) सदर योजनेचा वापर हंगामी स्वरुपात होऊ नये याकरीता योजनेत समाविष्ट गावातील अस्तित्वातील योजना चालविण्यात येऊ नयेत.
९) योजनेत समाविष्ट गावाचा समावेश केंद्र शासनाच्या IMIS या प्रणालीवर करण्यात यावा. योजनेची कामे मंजूर किंमतीत कालबध्द व नियोजनबध्दरित्या टप्या-टप्याने पूर्ण करण्यात यावीत. योजनेचा उद्भव विकसित झाल्याशिवाय इतर कामे सुरु करु नयेत. उद्भवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत.
१०) योजनेतून ठोक स्वरुपात पाणी घेणेबाबत प्रत्येक ग्रामपंचायतीसोबत Stamp paper वर करारनामा करण्यात यावा.
११) योजना चालविणे व देखभाल दुरूस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबंधित ग्रामपंचायतीने योजनेच्या अंमलबजावणीसाठी प्रस्तावामध्ये नमूद केल्यानुसार घरगुती, बिगर

घरगुती व संस्थात्मक नळजोडणी धारकासाठी पाणी पट्टीचा दर निश्चित करावा व त्यात कालपरत्वे वाढ करण्यात यावी.

१२) वसूल करण्यात आलेल्या पाणीपट्टीपैकी २० टक्के पाणीपट्टी ही मोठ्या देखभाल दुरुस्तीकरिता योजना राबविणाऱ्या संस्थेकडे ठेवण्यात यावी. योजनेच्या पाईप्स या उपांगाची देखभाल दुरुस्ती प्रत्येक ५ वर्षांनी व इतर उपांगाची देखभाल दुरुस्ती प्रत्येक ३ वर्षानी करावी.

१३) योजना चालविणे त्याचे परिरक्षण व देखभाल दुरुस्ती यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/ जिल्हा परिषदेस/महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

१४) सदर योजनेतील सर्व गावे हागणदारी मुक्त असले तरी ते नेहमीच हागणदारी मुक्त राहतील याबाबत खात्री करावी.

१५) कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास शासनाकडून जादा अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

१६) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची पुर्तता करण्यात यावी. तसेच संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयातील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

१७) संदर्भाधीन क्र.१० येथील दिनांक १५ जून, २०१५ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार योजनेचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणे अनिवार्य राहील.

१८) योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी निश्चित करणे व त्यात आवश्यकतेनुसार वाढ करणे ग्रामपंचायतीस बंधनकारक राहील. याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अधिकाऱ्यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना स्पष्टपणे सविस्तर माहिती द्यावी व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरूवात करावी.

१९) योजनेची अंमलबजावणी पूर्ण झाल्यानंतर संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने योजना पूर्णत्वाचा दाखला सक्षम प्राधिकाऱ्याकडे सादर करणे बंधनकारक राहील.

२०) योजनेच्या अंमलबजावणीमध्ये कोणत्याही स्वरुपाची अनियमितता, अपहार अथवा गैरव्यवहाराच्या बाबी निदर्शनास आल्यास अनियमिततेस जबाबदार संबंधित अधिकारी/ कर्मचारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहतील.

२१) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत ग्रामीण पाणीपुरवठा योजनांकरीता विहित केलेली मानके पूर्ण करणे बंधनकारक राहील.

२२) योजनेच्या प्रगतीप्रमाणे खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे व योजनेच्या पुर्णत्वाचे दाखले संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून प्राप्त करुन घेवून शासनास सादर करण्याची जबाबदारी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो), बेलापूर यांची राहील.

२. या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त होणाऱ्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०७१४४४५६५६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deelip Pandurang Patil

Digitally signed by Deelip Pandurang Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3810fd2c32f3841df60ca68a27ae50fdbc9fd6c506fd334325871d684bf3eef9, cn=Deelip Pandurang Patil
Date: 2019.01.07 14:50:23 +05'30'

**( दि. पां. पाटील )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई.
२) मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६) जिल्हाधिकारी, रत्नागिरी.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी.
८) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
९) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
१०) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
११) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१२) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे
१२) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवीन पनवेल
१३) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१४) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, रत्नागिरी
१५) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, रत्नागिरी
१६) कार्यासन (पापु-०४, ०७,१०,१३,१७, १८ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
१७) निवड नस्ती, कार्यासन पापु-०६.